दरकराराव्यतिरिक्त वस्तूंच्या वार्षिक खरेदीसाठी राजपत्राव्दारे निविदा मागविण्यासाठी दिनांक 2 जानेवारी 1992 च्या शासन निर्णयात धारलेल्या रु.20,000 च्या मर्यादेमध्ये वाढ करणे बाबत.

GR-20040730122342001-1100

महाराष्ट्र शासन,
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्रमांक भांखसं-1093/(2635)/उद्योग-6,
मंत्रालय, मुंबई 400 032. दिनांक 16 जुलै 1993.

वाचा:- (1) महाराष्ट्र शासन राजपत्र दिनांक 12 डिसेंबर 1991 मध्ये प्रसिध्द झालेली शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्रमांक एमसीई 1091/(5)/विनियम, दिनांक 22 नोव्हेंबर 1991.

(2) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखसं 1088/(2512)/उद्योग-6, दिनांक 2 जानेवारी 1992.

प्रस्तावना:- शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखसं 1088/(2512)/उद्योग-6, दिनांक 2 जानेवारी 1992 च्या परिच्छेद 8.3(फ) नुसार एका विशिष्ट वस्तूची वार्षिक खरेदी रु.20,000/- किंवा त्यापेक्षा अधिक असेल अशावेळी राजपत्रात निविदा चौकशी प्रसिध्द करुन निविदा मागविणे बंधनकारक आहे अशी तरतूद आहे. तथापि, दिनांक 22 नोव्हेंबर 1991 रोजी प्रसिध्द झालेल्या महाराष्ट्र शासन राजपत्रात, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, 1965 च्या परिशिष्ट-6 मधील नियम 2 मध्ये सुधारणा केल्यानुसार रु.50,000/- किंवा त्यापेक्षा जास्त रकमेची खरेदी असेल तर महाराष्ट्र शासन राजपत्र पुरवणी भाग-2 मध्ये निविदा चौकशी प्रसिध्द करुन जाहीर निविदा मागवाव्यात अशी तरतूद वित्त विभागाने केलेली आहे.

वरील दोन्ही तरतुदींमध्ये राजपत्रात निविदा चौकशी प्रसिध्द करण्याच्या वित्तीय मर्यादांमध्ये दिसत असलेली भिन्नता दूर करण्यासाठी शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय:- शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखसं-1088/(2512)/उद्योग-6, दिनांक 2 जानेवारी 1992 मधील परिच्छेद 8.3(ड), 8.3(इ) व 8.3(फ) हे परिच्छेद वगळण्यात यावेत. त्याऐवजी संदर्भाधीन परिच्छेद 8.3 मध्ये खालील उप परिच्छेद अंतर्भूत करण्यात यावेत:-

(1) 8.3(ड) दरकराराव्यतिरिक्त वस्तूंची एका वेळी रुपये 500 पेक्षा कमी किंमतीची एकूण खरेदी करावयाची असल्यास, त्यासाठी कमीत कमी 3 दरपत्रके मागविण्याची गरज नाही. अशी खरेदी एका वेळी रु.1,000 पर्यन्त करावयाची असल्यास, सक्षम अधिकाऱ्याच्या मते महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, 1965 मधील तरतुदींचे पालन करणे ज्यावेळी शक्य नसेल त्यावेळी कमीत कमी 3 दरपत्रके मागविण्याची गरज नाही. अशी खरेदी शक्यतो मान्यताप्राप्त सहकारी भांडारातून करणे आवश्यक आहे.

(2) 8.3(इ): एका वेळी एखाद्या दरकराराव्यतिरिक्त वस्तूंची खरेदी रु.1,000 किंवा त्यापेक्षा जास्त असेल किंवा वार्षिक खरेदी रु.50,000 पेक्षा कमी असेल अशा वेळी मध्यवर्ती भांडार खरेदी संघटनेच्या वैध नोंदणीकृत पुरवठादारांकडून दरपत्रके मागवून प्रचलित नियमानुसार खरेदी करण्यात यावी.

(3) 8.3(फ) दरकराराव्यतिरिक्त वस्तूंची खरेदी करताना एका वस्तूची एकूण वार्षिक खरेदी रु.50,000

किंवा त्यापेक्षा अधिक असेल अशा वेळी राजपत्रात निविदा चौकशी प्रसिध्द करुन निविदा मागविणे बंधनकारक आहे. या खेरीज त्या निविदेची जाहिरात मोजक्या शब्दात माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत योग्य त्या वृत्तपत्रात देणेही आवश्यक आहे.

वरील तरतूदीचे पालन केले जात नाही असे आढळून आले आहे.

2. परिच्छेद 8.3(ग) मधील विवरणपत्रातील अनुक्रमांक-1 येथील नोंद वगळण्यात येत आहे. त्यामुळे त्या विवरणपत्रातील उर्वरीत अनुक्रमांक 2 ते 6 यांना अनुक्रमांक 1 ते 5 असे संबोधण्यात यावे.

3. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौ.सं.क्र.259/93-विनियम, दिनांक 31 मे 1993 नुसार निर्गमित केले आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

स.गो. सरोदे,

कार्यासन अधिकारी.